# मिनी मावशी आणि मोठ्ठं वादळ

लेखिका - मेरी स्किलिंग्ज प्रिग

चित्रे - बेट्सी लेविन

मराठी: वंदना भागवत





मिनी मावशीची नऊ भाचरं तिच्याबरोबर शेतावर राहायची. विनू, दिनू, कन्नू, चुन्नू, गीता, मुन्नी, टिन्नी, भिंगरी, चिंगी- त्यांचे आईबाबा एका भयंकर अपघातात गेले. मग ती मिनी मावशीबरोबर शेतात राहायला आली. वसंत ऋतूत पेरण्या करायचे. सुगीच्या दिवसात कापणी.

एके दिवशी मोठ्ठं वादळ आलं. घराचे दरवाजे तुटले. छप्पर उडालं. झाडं पडली. शेत पाण्याखाली गेलं. पण मिनी मावशी आणि तिची भाचरं या सगळ्याला तोंड देऊन एकमेकांबरोबर ठाम उभी राहिली.

# मिनी मावशी आणि मोठ्ठं वादळ

लेखिका - मेरी स्किलिंग्ज प्रिग

चित्रे - बेट्सी लेविन

मराठी:  वंदना  भागवत

CLARION BOOKS • NEW YORK

ही  नऊ लहानमोठी भाचरं म्हणजे वावटळीच. गरगर फिरणाऱ्या. हसणाऱ्या. या टोकापासून त्या टोकापर्यंत शेतात भिरभिरणाऱ्या. पण मिनी मावशीनं हाक मारली की सुसाट पळत, ढांगा टाकत, दुडदुडत, सगळे हजर व्हायचे. शेतीच्या कामात मदत करायचे.






मुलं मोठी व्हायला लागली तसं मिनी मावशीचं शेतघर लहान व्हायला लागलं. त्यांना राग यायचा. 'हे कसलं घर! अडचण आहे नुसती.' ते तक्रार करायचे.

मिनी मावशी म्हणायची, "खरंय रे, आपल्याकडे पुरेशी जागा नाही पण आपण एकमेकांना पुरेसे आहोत, हो की नाही? कन्नूला लागलं की चुन्नू औषध लावतो. विनूला भूक लागली की दिनू उंचावर ठेवलेला लाडूचा डबा काढून देतो. चिंगीला रात्री शू लागली की टिन्नी घेऊन जाते. हो की नाही?"





शिवाय बाहेर उंडारायला केवढं मोठं शेत होतं! पोरं शेतात पांगलेली असली की त्यांना बोलवायला मिनी मावशीला घंटाच बडवायला लागायची. तिनं गावातल्या शाळेतून एक घंटा आणून ठेवली होती. घण घण घण वाजायची. घण घण घण - घरात येतंय कोण कोण कोण? मिनी मावशी हाकारायची. घंटा वाजली की मुलं पळत घरात यायची. जेवण तय्यार असणार! हे त्यांना कळायचं.





पण घंटा वाजण्याच्याही तऱ्हा होत्या हां. घण घण घण- कोण कोण कोण? ही जेवणाची घंटा. ठणठण ठणठण ठणठण - कपिला गोठ्यातून पळालीय, शेतात मुळे खातेय का बघा बरं, घेऊन या तिला ठणठण ठणठण ठणठण - मग दिनू, गीता, मुन्नी, भिंगरी पळत सुटायचे- मुळे खातेय की कोथिंबीर? बघून कपिलेला घेऊन यायचे. गोठ्यात बांधायचे. मग मिनी मावशी तिला रागावायची. "हे ग काय कपिले? पाटी आंबोणानं भरलीय आणि ती टाकून तू शेतात कशी जातेस?" कपिला शिंगं हलवायची आणि म्हणायची. "हम्मा!"



कधी कधी मुलं घरात असताना पण घंटा वाजायची. पण अगदी हळू आणि मऊ. किण किण, किण किण. रशीदचाचा यायचे रविवारी. मुलांना गणित आणि गाणं शिकवायला. गणित सोप्पं असायचं. शेतातल्याच काड्या काटक्या आणि चिंचा आवळे घेऊन शिकवायचे. लग्गेच समजायचं. पण गाणं भारी अवघड. ओरडायचं नाही. किंचाळायचं नाही. छान पट्टीत, सुरात गायचं म्हणजे एकदम शहाण्या मुलांसारखं वागायला लागायचं. पण ते फक्त रविवारीच.



पेरणीच्या दिवसात खूपच काम असायचं. जमीन नांगरायची. तण काढायचं. सऱ्या पाडायच्या. बियाणी निवडायची. पेरायची. मग बुजगावणी उभी करायची. धान्य तयार झालं की आणखी धावपळ. "आपल्याआधी पक्ष्यांची घरटी भरतील धान्यानं. त्यांची बेगमी व्हायची आणि आपण उपाशी राहयचो. चला कामाला लागा." मिनी मावशी म्हणायची.

धान्य तयार झालं की गडबड सुरु. कापणी करायची. झाडांची फळं काढून त्यांचे जॅम करायचे. धान्याच्या कणग्या कोठीच्या खोलीत भरुन ठेवायच्या. मग सुट्‌टी.

उन्हाळा तापायचा. मग उन्हाळ्याची कामं. पण साखरांबा, गुळांबा, मेथांबा, बटाट्याचा वाळवलेला कीस, गाजराचा वाळवलेला कीस, पापड्या कुरडया असं सगळं तयार होऊन बरण्या फडताळात गेल्या की मस्त वाटायचं.घरात बसून राहायला लागायचं.

कोठीच्या खोलीत जायची चुन्नू आणि मुन्नीला भीती वाटायची, फडताळात पाल असायची, मोरीतून बेडूक यायचे. पण मिनी मावशी म्हणायची, "पाली किडे खातात म्हणजे आपल्या मैत्रिणीच. आणि बेडूक काही करत नाहीत." ती बेडकांच्या तंगड्या धरुन त्यांना बाहेर टाकून द्यायची.





उन्हाळ्यात बाहेर पडता यायचं नाही. खूप ऊन. मग घरी बसून पोळीवर साखरांबा नाहीतर गुळांबा पसरुन खायला आणि भाताशी लोणचं खायला मजा यायची. तळलेल्या पापड्या कुरडया तर मस्तच लागायच्या.

एके दिवशी आभाळ काळ्याभोर ढगांनी भरायला लागलं. मिनी मावशी म्हणाली, "गारा तर पडणारच. पण वाराही सुटलाय, फार दूर जाऊ नका. जवळच खेळा. मला काळजी वाटली तर मी घंटा वाजवीन मग लगेच पळत या."





तसंच झालं. आभाळ काळंभोर झालं. हत्तीसारखे मोठे मोठे ढग आभाळात गर्दी करायला लागले. विजा कडकडायला लागल्या. जोराचा वारा सुटला.  मिनी मावशी मटार तोडत होती ती घरात गेली आणि तिनं घंटा वाजवायला सुरुवात केली. घण घण घण. घण घण घण.

विनू, दिनू, कन्नू, चुन्नू, गीता, मुन्नी, टिन्नी, भिंगरी, चिंगी पळत पळत घरात आले. विनू दिनूनं कोंबड्यांचं खुराडं ओढत पडवीत आणलं. कन्नू, चुन्नूंनी कपिलेचं दावं सोडून तिलाही घरात बांधली. वाघ्या कुत्रा आणि चिकणी कुत्री पळत पळत घरात आली. पलंगाखाली जाऊन बसली.





जोराचा वारा सुटला. पानं गोल गोल भिरभिरायला लागली. झाडं जमिनीवर लोळण घ्यायला लागली. काही झाडं तर कोसळून पडली. पावसाचा जोर इतका वाढला की समोरचं काही दिसेनासं झालं. वाऱ्यानं दाराच्या कड्या उचकटल्या. दारं थाडथाड वाजायला लागली. मिनीमावशी म्हणाली, "सगळेजण कोठीच्या खोलीत चला. कणग्यांच्या आड बसा. चला चला. लवकर चला. हे पावसाचं भूत चेकाळलं आहे. काही खरं नाही याचं. आपण घाबरायचं नाही, चला एकमेकांना पकडून आतमध्ये या. कोठीचं दार भक्कम आहे. चला."



मग विनूनं दिनूला पकडलं. दिनूनं कन्नूला. कन्नूनं चुन्नूला. चुन्नूनं गीताला. गीतानं मुन्नीला. मुन्नीनं टिन्नीला. टिन्नीनं भिंगरीला. मावशीनं चिंगीला कडेवर घेतलं. सगळे कोठीच्या खोलीत दाटीवाटीनं बसले. पाली आल्या तर? गांधीलमाशा आल्या तर? असं कोण्णाच्या मनात देखील आलं नाही. त्यांना लागेलच ना निवारा! पाऊस इतका झपाटला तर.



इतक्यात कड कड कड आवाज झाला. वीज पडली. मग सगळं शांत झालं. पाऊस थांबला.

"डराव डराव डराव." आवाज यायला लागले.

"चला बेडूक मामांच्या लग्नाला." मिनीमावशी म्हणाली.

सगळे हसले. उठले. बाहेर आले. आकाश स्वच्छ झालं होतं. सूर्य चमकायला लागला होता.

"वादळ गेलं. आपण सगळे एकमेकांना होतो ते किती बरं झालं ना? एकटे एकटे असतो तर काय केलं असतं?" मिनीमावशी म्हणाली.

चिंगीनं तिच्या गळ्याला घट्ट मिठी मारली. सगळी मुलं हसली.

"चला, बघूया आता वादळाचे प्रताप." मिनीमावशी म्हणाली.



बाहेर आले तर काय! अरे देवा! शेताची नुसती दशा झाली होती.

गोठ्याचं छत उडून गेलं होतं. खुराडं मोडलं होतं. कोंबड्या कलकलत फळ्या-कपाटांवर बसल्या होत्या. शेतातलं चिंचेचं झाड मोडून पडलं होतं. वीज पडून जळलं होतं. कपिला हंबरत होती. पाण्याचे ओढे शेतातून वाहात होते. सगळी रोपं पाण्याखाली होती.

"चला आपण जरा घराभोवती हिंडून बघू, काय काय शिल्लक आहे, काय नाही." मिनीमावशी म्हणाली.

सगळ्यांनी एकमेकांचे हात धरुन साखळी केली. एकमेकांना सांभाळत ते घराच्या मागे गेले. मागचं दार उचकटून पडलं होतं. गोठा पाण्याखाली होता. कुंपण जमीनदोस्त झालं होतं.

"आपण आता कोणाकोणाचं घर उन्हात बांधायचं?" मिनी मावशी म्हणाली.

मुलं खूष झाली.





"दारं तर सगळी तुटून गेली आहेत. घराची पुढची बाजू कोणती आणि मागची कोणती काही कळत नाहीये. हे असं कसं चालेल?" मिनी मावशी म्हणाली. "नाहीतरी घर लहानच झालं होतं. आता ते मोठं करु."



मग गावातून गवंड्याला बोलावलं. सुताराला बोलावलं. चांगल्या दोन खोल्या बांधल्या. दारं दुरुस्त केली. घराभोवती पाणी जायला चर खोदले. कुंपण बांधलं. खुराडं भिंतीत ठोकून बसवलं. गोठ्यावर भक्कम पत्रे टाकले. नवीन चिंचेचं झाड लावलं. सगळ्यांना भरपूर जागा मिळाली. आपल्याकडे घर आहे, उन्हा-पावसात, वादळ वाऱ्यात टिकणारं, हे मुलांना कळलं. मुख्य म्हणजे आपण सगळे आहोत एकमेकांना. कितीही मोठ्ठं वादळ आलं तरी. असंही कळलं.

घर बांधून पूर्ण झाल्यावर शेजाऱ्यापाजाऱ्यांना नवीन घराचं जेवण दिलं. मग रशीद चाचांनी मुलांना नवीन गाणं शिकवलं.

"हम होंगे कामयाब...."

